**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन आदेश क्रमांकः बदली-२०१८/प्र.क्र.४४/१४-अ**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीख: १३ नोव्हेंबर, २०१८

<u>वाचा:</u> १) शासन आदेश क्र.एएससी १५१०/प्र.क्र.२१७/१४-अ, दिनांक १०-०९-२०१८

२) राज्य माहिती आयोग, कोकण खंडपीठ, क्र.रामाआ-२०१३/प्र.क्र.२/१७/आस्थापना, दिनांक २८-०९-२०१८

## शासन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) व ४ (५) अनुसार खाली नमूद केलेल्या मंत्रालयीन विभागातील लघुलेखकांची आंतरविभागीय बदली करण्यात येत असून, त्यांच्या नावासमोरील स्तंभ-५ मध्ये दर्शविलेल्या विभागात त्यांची बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ. क्र. | श्री / श्रीमती | लघुलेखकाचे नांव | सध्याचा विभाग | बदलीनंतर पदस्थापनेचा विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्रीमती | रं.वि.वाघमारे (वरिष्ठ स्वीय सहायक) | महिला व बाल विकास विभाग | विधि व न्याय विभाग |
| २ | श्री | गु.रा.चौधरी (निवडश्रेणी लघुलेखक) | अल्पसंख्यांक विकास विभाग | अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग |
| ३ | श्रीमती | शा.सु.शेख (उच्चश्रेणी लघुलेखक) | सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (प्रतिनियुक्तीवरुन प्रत्यावर्तित) | अल्पसंख्यांक विकास विभाग |
| ४ | श्रीमती | पु.प्र.कडतन (निम्नश्रेणी लघुलेखक) | आदिवासी विकास विभाग | महिला व बाल विकास विभाग |

२. बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तत्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरिता सर्व मंत्रालयीन विभागांनी खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे :-

(१) बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर सर्व विभागांनी पर्यायी कर्मचारी हजर होण्याची वाट न पाहता बदली झालेल्या कर्मचाऱ्यांना तत्काळ कार्यमुक्त करावे.

(२) बदली झालेले कर्मचारी त्यांच्या संबंधित विभागातून कार्यमुक्त होऊन रुजू होण्यासाठी आल्यानंतर त्यांना विनाविलंब रुजू करुन घ्यावे. एखाद्या कर्मचाऱ्याला रुजू करुन न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतीक्षा काळ ठरवून काम न देता वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधित विभागाच्या आस्थापना अधिकाऱ्याला जबाबदार धरण्यात येईल.

(३) बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही कर्मचाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे कर्मचारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील.

३. विभागाने अ.क्र.१,२ व ४ येथील बदली झालेल्या लघुलेखकांना दिनांक ३०/११/२०१८ (म.नं.) पर्यंत कार्यमुक्त न केल्यास शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१८६/१६/का.१४, दिनांक २३ डिसेंबर, २०१६ मधील तरतुदीनुसार सामान्य प्रशासन विभागाकडून कार्यवाही करण्यात येईल याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

४. बदली झालेल्या लघुलेखकांना संबंधित विभागाने कार्यमुक्त करुन या विभागास कळवावे. तसेच बदली झालेल्या लघुलेखकांनी त्यांची पदस्थापना केलेल्या विभागात तत्काळ रुजू व्हावे.

५. श्रीमती शा.सु.शेख, उच्चश्रेणी लघुलेखक यांच्या सेवा संदर्भाधिन क्र. १ येथील आदेशान्वये त्यांच्या मूळ विभागात (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग) प्रत्यावर्तित करण्यात आले होते. त्यानुसार त्यांना राज्य माहिती आयोग, कोकण खंडपीठ यांनी संदर्भाधिन क्र. २ येथील आदेशान्वये दिनांक २९-०९-२०१८ (म.पू) रोजी कार्यमुक्त केले आहे. प्रशासकीय कारणास्तव श्रीमती शेख या दिनांक २९-०९-२०१८ (म.पू) या सामान्य प्रशासन विभागात रुजू होण्यासाठी आले असता त्यांचे फेर पदस्थापनेचे आदेश विचाराधिन असल्यामुळे तसेच श्रीमती शेख यांना प्रशासकीय कारणास्तव दिनांक २९-०९-२०१८ या आदेशाच्या दिनांकापर्यंत पदस्थापनेच्या प्रतिक्षेत रहावे लागल्यामुळे श्रीमती शेख यांचा दिनांक २९.०९.२०१८ ते आदेशाच्या दिनांकापर्यंतचा सक्तीचा प्रतिक्षाधिन कालावधी मंजूर करण्यास सामान्य प्रशासन विभागाची मान्यता देण्यात येत आहे. सक्तीचा प्रतिक्षाधिन कालावधी मंजूर करण्याची कार्यवाही म.ना.से. (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम १९८१ च्या नियम ९ (१४) (एफ) नुसार व शासन निर्णय, वित्त विभाग दि.२.६.२००३ मधील तरतुदीनुसार अल्पसंख्यांक विकास विभागाने करावी.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१११३१५०४५२०१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Gajanan
Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2018.11.13 17:11:19 +05'30'

**( ग.भि.गुरव )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

संबंधित लघुलेखक (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)

**प्रत,**

१) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
२) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग, (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)
३) सह/उप सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग,
४) आंहरण व संवितरण अधिकारी, संबंधित मंत्रालयीन विभाग
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६) निवड नस्ती/संग्रहार्थ (कार्यासन १४-अ).